**जीवन शिक्षण संस्था लाखणी जि. भंडारा, द्वारा संचलित कस्तूरबा गांधी प्राथमिक आश्रमशाळा चान्ना/धानला ही आश्रमशाळा प्रताप शिक्षण संस्था आजंती ता. नेर जि. यवतमाळ या संस्थेस हस्तांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्र. विभशा २०१४/प्र.क्र. २१७/विजाभज-२**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२**
दिनांक : २८ ऑगस्ट, २०१४.

**वाचा :** - १) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. विभशा-२००७/प्र.क्र.९२/मावक-६ दि. ०१ ऑगस्ट, २००७
२) संचालक विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र. विजाभजसं/आशा/हस्तांतरण/२०१४-१५/१०५३ दि. १९ ऑगस्ट, २०१४.

**प्रस्तावना:-**

जीवन शिक्षण संस्था लाखणी जि. भंडारा, द्वारा संचलित कस्तूरबा गांधी प्राथमिक आश्रमशाळा चान्ना / धानला ही आश्रमशाळा प्रताप शिक्षण संस्था आजंती ता. नेर जि. यवतमाळ या संस्थेस हस्तांतरीत करण्याबाबतचा प्रस्ताव संचालक विजाभज, पुणे यांच्याकडून संदर्भाधीन दिनांक दि. १९ ऑगस्ट, २०१४ च्या पत्रान्वये प्राप्त झाला असून सदर आश्रमशाळेत विद्यार्थी पट संख्या कमी असल्यामुळे व विद्यार्थी मिळत नसल्यामुळे ही आश्रमशाळा प्रताप शिक्षण संस्था आजंती ता. नेर जि. यवतमाळ या संस्थेस शासन निर्णय दिनांक १ ऑगस्ट, २००७ मधील आश्रमशाळा हस्तांरणाबाबतच्या क्ष येथील तरतुदीनुसार हस्तांतरीत करण्याचा प्रस्ताव शासननाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

जीवन शिक्षण संस्था लाखणी जि. भंडारा, द्वारा संचलित कस्तूरबा गांधी प्राथमिक आश्रमशाळा चान्ना / धानला ही आश्रमशाळा प्रताप शिक्षण संस्था आजंती ता. नेर जि. यवतमाळ या संस्थेस सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षापासून हस्तांतरीत करण्यास पुढील अटीस अनुसरुन शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. प्राथमिक आश्रमशाळेत कार्यरत असलेल्या मान्यताप्राप्त शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांचे हस्तांतरण नवीन संस्थेकडे वर्ग होईल. मात्र अस्थायी व नियमानुसार पात्र नसलेल्या कर्मचा-यांना नवीन संस्थेकडे हस्तांतरीत होण्याचा हक्क राहणार नाही.

२. निवासी आश्रमशाळांचे हस्तांतरण ज्या कर्मचा-यांना मान्य नाही अशा कर्मचा-यांबाबत आवश्यक ती वेतनाची भरपाई संस्थेमार्फत देण्यात येईल व त्यांच्या सेवा आपोआप संपुष्टात येतील.

३. शासकीय निधीतून निवासी शाळेसाठी उपलब्ध करुन दिलेल्या मालमत्तेचे हस्तांतरण व

दस्ताऐवज नवीन संस्थेकडे हस्तांतरीत करण्यात येईल.

४. सदर प्राथमिक आश्रमशाळेतील निवासी व अनिवासी विद्यार्थ्यांचे प्रवेश कायम रहातील.

५. नवीन संस्थेस ही आश्रमशाळा शासनाचे धोरणास अनुसरुन चालवावी लागेल तसेच भविष्यात शासनाने घेतलेले निर्णयही त्यांचेवर बंधनकारक राहतील.

६. या हस्तांतरण प्रक्रियेस अनुसरुन नवीन संस्थेस कोणतेही नवीन पद अनुज्ञेय होणार नाही. मात्र पद रिक्त असल्यास त्या रिक्त जागेवर त्या संस्थेतील, जिल्ह्यातील, विभागातील किंवा राज्यातील अतिरिक्त कर्मचा-यांच्या यादीमधून सेवा ज्येष्ठ कर्मचा-यास नियुक्ती देणे बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२८१४०८३९८५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji Sonaji Choure

Digitally signed by Shivaji Sonaji Choure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shivaji Sonaji Choure
Date: 2014.08.30 16:16:28 +05'30'

(शिवाजी चौरे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, ३ चर्च रोड, पुणे -४११ ००१.
२) प्रादेशिक उपायुक्त समाजकल्याण विभाग, नागपूर.
३) सहाय्यक आयुक्त समाजकल्याण, भंडारा.
४) महालेखापाल महाराष्ट्र २ (लेखा परीक्षा वा लेखा अनुज्ञेयता) नागपूर
५) जिल्हा कोषगार अधिकारी, भंडारा.
६) मा. मंत्री (सखा. न्या.) यांचे खाजगी सचिव
७) अध्यक्ष प्रताप शिक्षण संस्था आजंती ता. नेर जि. यवतमाळ
८) सचिव, जीवन शिक्षण संस्था लाखणी जि. भंडारा.
९) निवड नस्ती.